चित्रपटगृहांतून पर्यावरण विषयक
संदेश प्रदर्शित करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन,
# गृह विभाग.

शासनपरिपत्रक क्रमांक:-बीसीआर ११/२०००/८३/विशा.५,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक :- ०८ ऑगस्ट, २०००.

**वाचा** :- सर्वोच्च न्यायालय, दिल्ली यांचे दिनांक २२.११.१९९९ चे याचिका क्र.८६०/९१ मध्ये दिलेले आदेश.

**शासन परिपत्रक** :- मा.सर्वोच्च न्यायालयाने याचिका क्र.८६०/९१ मध्ये चित्रपटगृह सुरु होण्याआधी प्रत्येक खेळाच्या अगोदर सर्व स्थायी, स्थायिवत, फिरत्या व व्हिडीओ चित्रपटगृह चालकांनी पर्यावरणाच्या संदर्भातील किमान दोन सिनेमा स्लाईडस् व पर्यावरण विषयक संदेश प्रदर्शित करणे बंधनकारक करावे व अशी सिनेमा परवान्यामध्ये अट घालावी, असे दिनांक २२.११.१९९१ रोजी केंद्र शासनाला निर्देश दिले आहेत.

तद्नुसार शासन सर्व परवाना प्राधिकाऱ्यांना असे आदेश देत आहे की, जेव्हा चित्रपट गृह चालक चित्रपटगृह बांधून पूर्ण करेल व चित्रपट प्रदर्शित करण्यासाठी "ई" फॉर्ममध्ये सिनेमा परवाना मिळण्यासाठी अर्ज करेल. तेव्हा सर्व स्थायी, स्थायिवत, फिरत्या व व्हिडीओ चित्रपटगृह तसेच ड्राईव्ह इन चित्रपटगृह चालकांना चित्रपट प्रदर्शित करण्यापूर्वी पर्यावरणाच्या संदर्भातील किमान दोन सिनेमा स्लाईडस व पर्यावरणविषयक संदेश प्रसारित करणे बंधनकारक करावे, असे संदेश स्थानिक बोलीभाषेतून असावेत व ते चित्रपटगृह चालक प्रसारित करतात किंवा कसे याची परवाना प्राधिकाऱ्यांनी अधून-मधून तपासणी करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

विтуप्रभू

( वि. तु. प्रभू )
कार्यासन अधिकारी, गृह विभाग (विशेष),
महाराष्ट्र शासन.

प्रति,

सर्व पोलीस आयुक्त.
सर्व जिल्हादंडाधिकारी.